५२।८
१४।२।९४.

विक्रीकर आयुक्तांना

अधिकाराचे प्रत्यायोजन

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
निर्णय क्रमांक-आरयुजी-११९२/सीआर-१५२/कराधान-१.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- १४ फेब्रुवारी १९९४.

निर्णय

महाराष्ट्र अंतर्गत कोणताही माल कोणत्याही प्रयोजनार्थ वापरण्याच्या हक्काच्या हस्तांतरणावरील विक्रीकर अधिनियम, १९८५ खालील प्रकरणे विनियमित करण्यासाठी विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना अधिकाराचे प्रत्यायोजन करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केलेल्या मर्यादेपर्यंतचे अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्रदान करण्याचा निदेश शासन देत आहे आणि त्यांना इष्ट वाटेल त्याप्रमाणे त्यांच्या नियंत्रणाखालील विक्रीकर प्राधिका-यांना हे अधिकार पुन:प्रत्यायोजित करण्यास त्यांना प्राधिकृत करता येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि.प्र. कुळकर्णी
[ वि.प्र. कुळकर्णी ]
शासनाचे अवर सचिव,
वित्त विभाग.

विवरणपत्र

विक्रीकर विभागाला अधिकाराचे प्रत्यायोजन.

| अ.क्र. | प्रत्यायोजित केलेल्या अधिकाराचे स्वरूप. | अधिकारांचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी आणि प्रत्यायुक्त केलेल्या अधिकारांची मर्यादा. | ज्या शर्तीच्या अधीन प्रत्यायुक्त अधिकारांचा वापर करावयाचा आहे ती शर्त. | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १. | प्रशासकीय सहाय्य मंजूर करून महाराष्ट्र कोणताही माल कोणत्याही प्रयोजनार्थ वापरण्याच्या हक्काच्या हस्तांतरणावरील विक्रीकर अधिनियत, १९८५ यांच्या कलम ७ अन्वये नोंदणी न केलेल्या व्यापा-यांची प्रकरणे विनियमित करण्याचे अधिकार. | विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | [एक] नोंदणीसाठी आवेदन करण्यात विलंब केल्यामुळे तांत्रिक महसूलातील तोटयाहून विभिन्न असा शासनाच्या वास्तविक महसूलात तोटा होता कामा नये, आणि<br>[दोन] टाळाटाळ करण्याच्या प्रयत्नांच्या उद्देशाने विलंब होता कामा नये किंवा कायदेशीर कर भरण्यास विलंब होता कामा नये. | आयुक्तांना त्यांच्या नियंत्रणाखालील विक्रीकर प्राधिका-यांकडे या अधिकाराचे पुन:प्रत्यायोजन करता येईल. |
| २] | दुहेरी कर आकारणी अंतर्भूत असलेल्या प्रत्येक प्रकरणात रु. ५० हजार पेक्षा अधिक नसेल इतकी प्रशासकीय सूट मंजूर करण्याचे अधिकार. | विक्रीकर आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई. | [एक] विशिष्ट व्यापार प्रणालीमुळे किंवा कायद्यातील तरतुदीमुळे किंवा उच्च न्यायालयाच्या निर्णयामुळे प्रकरणपरत्वे महाराष्ट्र कोणताही माल कोणत्याही प्रयोजनार्थ वापरण्याच्या हक्काच्या हस्तांतरणावरील विक्रीकर अधिनियम, १९८५ नुसार एकाच देवाणघेवाणीवर दुहेरी कर भरल्याचे प्रकरण आहे अशी आयुक्तांची खात्री पटली पाहिजे. | आयुक्तांना त्यांच्या नियंत्रणाखालील विक्रीकर प्राधिका-यांकडे या अधिकाराचे पुन:प्रत्यायोजन करता येईल. |

| १. | २. | ३. | ४. | ५. |
|---|---|---|---|---|
| | | | [दोन] एकाच देवाणघेवाणीवर दुस-या वेळेला भरलेला अतिरिक्त कर शासकीय कोषागारात खरोखरच जमा केला असेल आणि परत केलेला नसेल आणि/ किंवा एकाच व्यापा-यांकडून येणे असलेल्या इतर देय रकमांच्या संबंधात समायोजित केलेला असेल.<br>[तीन] प्रशासकीय सहाय्यामुळे शासनाला कायदेशीररित्या येणे असेल अशा महसूलाची प्रत्यक्ष हानी होणार नाही. | |
| ३. | प्रत्येक निर्धारणकाळात प्रत्येक प्रकरणात रु. ५०,००० पेक्षा अधिक असणार नाही एवढ्या विक्रीकराच्या येणे असलेल्या रकमा निर्लेखित करण्याचे अधिकार. | विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | वेळोवेळी सुधारणा करण्यात आल्याप्रमाणे आणि महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ मध्ये नमूद केलेल्या पध्दतीचा अवलंब केल्यानंतर, शासकीय परिपत्रक क्र. पीएसी-१३६५/१२०४/[एक]/सात, दिनांक २२ जून १९६५, मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीचे अनुसरण केल्यानंतर. | आयुक्तांना त्यांच्या नियंत्रणाखालील विक्रीकर प्राधिका-यांकडे या अधिकाराचे पुन:प्रत्यायोजन करता येईल. |
| ४. | शासन निर्णय, वित्त विभाग क्र. एसटीए५१०९०/१२८/ कराधान-२, दिनांक १८ फेब्रुवारी १९९३ अन्वये मंजूर केलेल्या बक्षिस | विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | बक्षिस मंजूर करण्याच्या योजनेत नमूद केलेल्या शर्तीनुसार. | आयुक्तांना त्यांच्या नियंत्रणाखालील विक्रीकर प्राधिका-यांकडे या अधिकाराचे पुन:प्रत्यायोजन करता येईल. |

| १. | २. | ३. | ४. | ५. |
| --- | --- | --- | --- | --- |
| | देण्याच्या योजनेनुसार कर चुकविल्याबद्दलची माहिती पुरविण्यासाठी माहिती पुरविणा-या व्यक्तीने दिलेल्या माहितीचा प्रत्यक्ष परिणाम म्हणून वसूल झालेल्या कराची रक्कम रु. १० लाखांपेक्षा कमी असेल अशा प्रत्येक प्रकरणात जास्तीत जास्त रु. २५,००० एवढे अतिरिक्त आणि अंतिम बक्षिस देणे. आणि वसूल झालेल्या कराची रक्कम रु. १० लाख किंवा अधिक असेल अशा प्रत्येक प्रकरणात जास्तीत जास्त रु. ३ लाखाएवढे अतिरिक्त आणि अंतिम बक्षिस देणे. | | | |